खारघर, नवी मुंबई येथील ग्रामविकास भवन प्रकल्पाच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय क्र.भवन-२०११/प्र.क्र.४४/पंरा-७
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
**दिनांक :२३ नोव्हेंबर,२०११**

**संदर्भ** : १. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.भवन-२००७/प्र.क्र.१६६/पंरा७, दि.१२.१०.२००७
२. अधिक्षक अभियंता, सिडको यांचे पत्र क्र.सिडको/एसई(खार)/२०११/३५, दि.५.३.२०११

**प्रस्तावना** :

राज्यातील पंचायतीराज स्थानिक स्वराज संस्थामधील पदाधिकारी, अधिकारी व कर्मचारी यांच्या करीता राज्यस्तरीय कार्यशाळा, प्रशिक्षण, विविध उपक्रम आणि बैठकांचे आयोजन करणे व त्या कालावधीत त्यांची निवासी सोय व्हावी, तसेच दारिद्र्य निर्मुलन कार्यक्रमाखाली स्थापन झालेल्या राज्यातील स्वंयसहायता बचतगटांना त्यांच्या विविध वस्तुंकरीता विक्रीची सोय होण्याच्या दृष्टीने राज्यस्तरीय बाजारपेठ उपलब्ध करणे, या करीता खारघर नवी मुंबई येथे ग्रामविकास /भवन प्रकल्प राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. यासाठी सन २००५-०६ च्या दरसूचीवर आधारीत रु. १६,१४,००,०००/- ढोबळ अंदाजपत्रकीय किंमतीच्या ग्राम विकास भवन प्रकल्पच्या बांधकामास संदर्भीय दि.१२.१०.२००७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये या प्रकल्पाचे बांधकाम सिडको मार्फत ठेव अंशदान पध्दतीने करुन घेण्याचा निर्णय घेण्यात आला असुन त्यानुसार सिडकोशी दिनांक ६ जून,२००८ रोजी सामंजस्य करार करण्यात आला आहे. सदर प्रकल्पाची वास्तुसंकल्पना व अंतर्गत सजावटीसाठी सिडकोने मे. रेडिअन्स डिझाईन्स सोल्युशन्स या वास्तुसल्लागाराची नियुक्ती केली आहे. या प्रकल्पाच्या स्थापत्य बांधकामासाठी (टप्पा-१) सिडकोने विहित कार्यपध्दती अनुसरुन मे. आय.व्ही.आर.सी.एल. प्रोजेक्टस् ॲन्ड इन्फ्रास्ट्रक्चर लि. या कंत्राटदार संस्थेची निवड केली असून, दिनांक १८.८.२००९ रोजी या कामाचे कार्यरंभ आदेश दिलेले आहेत. सद्य:स्थितीत सदरील प्रकल्पाचे बांधकाम प्रगतीपथावर आहे.

३. दरम्यानच्या कालावधीत दरसूचीत मोठ्याप्रमाणात झालेली दरवाढ, प्रकल्पाच्या बांधकामासाठी प्राप्त झालेले निविदेचे अधिक्य (+ ३५.६०% ), प्रत्यक्ष काम सुरु करताना उपलब्ध जागेनुसार आरसीसी कॉंक्रींट, रेनफोर्समेंट स्टिल व स्ट्रचरल स्टिलचा परिमाणत: झालेली वाढ, प्रत्यक्ष कामाच्या अनुषंगाने काही अतिरीक्त बाबी हाती घ्याव्या लागणे, अंतर्गत सजावटीच्या कामापोटी मूळ तरतुदीच्या तुलनेत झालेली वाढ तसेच विद्युत व पाणी पुरवठा जोडणी खर्च, आग प्रतिबंधक सुविधेकरीता ना हरकत प्रमाणपत्र खर्च, देखभाल खर्च, बाग-बगिचा व सुशोभिकरण या सारख्या संकीर्ण बाबींच्या खर्चाचा समावेश मूळ प्रशासकीय मान्यतेमध्ये नसल्याने, या बाबींपोटी प्रकल्पाच्या एकुण किंमतीत झालेली वाढ विचारात घेवुन सिडकोने ग्राम विकास भवन प्रकल्पाच्या एकुण रुपये ३५,६८,३६,०००/- सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची संदर्भीय दिनांक ५.३.२०११ च्या पत्रान्वये शासनास विनंती केली आहे. सिडकोने प्रस्तावासोबत कामाचे सविस्तर अंदाजपत्रक, प्रकल्पाच्या बांधकामाचे सविस्तर नकाशे, मूळ प्रशासकीय मान्यता व सुधारीत प्रशासकीय मान्यतेतील बाबींचा तुलनात्मक गोषवारा, बांधकामाचा स्थितीदर्शक प्रगती अहवाल इ. कागदपत्रे सादर केलेली आहेत.

४. ग्राम विकास भवन प्रकल्पाच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने सिडकोने सादर केलेल्या प्रस्तावाची सार्वजनिक बांधकाम विभागाने केलेल्या छाननीअंती, प्रकल्पाच्या एकुण रुपये ३५,६८,३६,०००/- सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: **<u>शासन निर्णय</u>** :-

५. ग्रामविकास भवन प्रकल्पाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रक्कम रुपये १६,४०,००,०००/- किंमतीमध्ये रुपये १९,५४,३६,०००/- इतकी वाढ करण्यात येवुन, एकुण रुपये ३५,६८,३६,०००/- (अक्षरी रुपये पस्तीस कोटी अडुसष्ट लक्ष छत्तीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास, खालील अटी-शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

(i) या प्रकल्पाअंतर्गत हाती घ्यावयाच्या अंतर्गत सोयी-सुविधा व सजावटीच्या बाबींच्या संदर्भात संबधित वास्तुसल्लागाराने त्याबाबतचे सादरीकरण शासनास केल्यानंतर त्यास स्वतंत्रपणे मान्यता देण्यात येणार असल्याने, सदर शासन मान्यतेशिवाय अंतर्गत सोयी-सुविधा व सजावटीचे काम हाती घेण्यात येवु नये.

(ii) या प्रकल्पासाठी घेण्यात आलेल्या विविध ना-हरकत परवानग्या (विद्युतीकरण, उद्वाहन, आगप्रतिबंधक सुविधा, पाणी पुरवठा व इतर), विविध उपक्रमांचे (चेक प्रुफिंग, सॉईल इन्व्हेस्टिगेशन, थर्डपार्टी क्वालीटी ऑडिट व इतर) तपासणी अहवाल सिडकोने त्या-त्या वेळी शासनास सादर करावेत.

(iii) या प्रकल्पाच्या बांधकामाचा संयुक्त तपासणी अहवाल सिडकोने दरमहा शासनास सादर करावा.

(iv) या प्रकल्पाच्या बांधकामास पुन्हा सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजुर किंमतीत प्रकल्पाचे बांधकाम पुर्ण करण्याची जबाबदारी सिडकोची राहील.

६. ग्राम विकास भवन प्रकल्पाच्या बांधकामाच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा बाबनिहाय तुलनात्मक गोषवारा दर्शविणारे विवरणपत्र -'अ' या सोबत जोडण्यात आले आहे.

७. ग्राम विकास भवन प्रकल्पाच्या बांधकामाकरीता उपलब्ध होणारा निधी हा मागणी क्र.एल-३, लेखाशिर्ष- "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायत राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१)(०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने-२५१५००५३" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

८. हे आदेश अनौपचारील सं.क्र.८२९८/सचिव/ग्रा.वि., दिनांक ८ नोव्हेंबर,२०११ अन्वये सचिव समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०११११२८१७०८०५००१. असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(चंद्रकांत ह.वडे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत
१) विभागीय आयुक्त कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१ मुंबई.

३) व्यवस्थापकीय संचालक, सिडको, सिडको भवन, नवी मुंबई.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे
६) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
७) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
८) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१०) सार्वजनिक बांधकाम विभाग (कार्यासन-इमा.३), मंत्रालय मुंबई ४०० ०३२
११) का.क्र, वित्त-१, वित्त-७ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई

**STATEMENT- 'A'**

( Annex of Government Resulation, R.D.&W.C.Dept.,No.Bhavan-2011/C.R.44/PR-7.dt. 11.2011)

## Comparative Statement of Revised Costing of Gramvikas Bhavan Project,Kharghar

(Amount in Rs.)

| Sr. | Perticulars | Approved Cost as pr A.A. | Revised A.A.Cost |
|---|---|---|---|
| I | **Part-A On-Going Work (phase-I)** | | |
| a | Estimated cost of work (Phase-I) | 113000000.00 | 133329000.00 |
| b | Contractor's quoted % (+35.60%) | 0.00 | 47465000.00 |
| c | Approved Excess over awarded cost (Excess qty + Extra items) | 0.00 | 22867000.00 |
| | **Total of Part A (phase-I)** | **113000000.00** | **203661000.00** |
| II | **Part -B Phase-II Work** | | |
| a | Estimated cost of Interior works (Phase-II) | 27000000.00 | 65194000.00 |
| b | Anticipated cost due to additional items (Pergola moulding, cladding, Fire alarm & P.A.systems etc.) | 0.00 | 15000000.00 |
| | **Total of Part B (Phase-II)** | **27000000.00** | **80194000.00** |
| III | **Part -C** | **140000000.00** | **283855000.00** |
| a | Escalation @8% on Phase-I&II | 14000000.00 | 22500000.00 |
| b | Contengencies @5% (on part B only) | 5600000.00 | 4010000.00 |
| c | Tender Premium on additional items & Interiour part | 0.00 | 12000000.00 |
| | **Total of Part C** | **19600000.00** | **38510000.00** |
| IV | **Part –D Miscellenous** | | |
| a | Proof cheking charges paid to IIT Pavai | 0.00 | 169000.00 |
| b | Soil Investigation charges | 0.00 | 351000.00 |
| c | Third Party Quality Audit fees | 0.00 | 154000.00 |
| d | Recovery of fees & Premium against development permission | 0.00 | 132000.00 |
| e | MSEDCL Charges (Provisional) | 0.00 | 1000000.00 |
| f | Water Supply Connection | 0.00 | 500000.00 |
| g | Fire Fighting Final NOC charges | 0.00 | 50000.00 |
| h | NOC charges to be paid with PWD for Lift (Provisional) | 0.00 | 100000.00 |
| i | Severage Connection(Provisional) | 0.00 | 50000.00 |
| j | Security System charges (Provisional) | 0.00 | 100000.00 |
| k | O/M of hvac | 0.00 | 1152000.00 |
| l | O/M for fire fighting | 0.00 | 200000.00 |
| m | O/M for Electrical equipments (Provisional) | 0.00 | 500000.00 |
| n | O/M for Passanger lift (Provisional) | 0.00 | 200000.00 |
| o | Maintainance of premises (Provisional) | 0.00 | 100000.00 |
| p | Horticulture & Land scaping (Provisional) | 0.00 | 250000.00 |
| | **Total of Part -D** | **1800000.00** | **5008000.00** |
| | **(Total of Part A+B+C+D)** | **161400000.00** | **327373000.00** |
| V | **Part –E Agency Charges** | | |
| | **CIDCO fees (9% of project cost)** | **0.00** | **29463570.00** |
| | **TOTAL COST OF PROJECT** | **161400000.00** | **356836570.00** |